**अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१०-११**
**मागणी क्र.वाय-६, ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र.बीयुडी-१०१०/प्र.क्र.१२९ /पापु-१५,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक- १६ सप्टेंबर, २०१०

**वाचा**- १. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय समक्रमांक दि.२७ एप्रिल, २०१०
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१०/सीआर ७१/अर्थसंकल्प-३ दिनांक १८ मे, २०१०
३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय समक्रमांक दि.२८ जून, २०१० व दि.२४ ऑगस्ट,२०१०
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र. भूसवियं/नियोजन/उपसंको/प्रयोगशाळा/संगणक कक्ष/७/२००९ दि.२ जानेवारी २०१०
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०.१०/प्र.क्र.१४९/अर्थसंकल्प-३ दिनांक ३० जुलै, २०१०

**प्रस्तावना:-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च " या लेखाशिर्षाखाली रु.१२८९.१६ लक्ष इतकी दत्तमत्त व रु.५.०० लक्ष इतकी भारित तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी संदर्भाधीन क्र.१ व ३ येथील शासन निर्णयान्वये “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च” या लेखाशीर्षाखाली रु. ६१९.५५ लक्ष (दत्तमत्त) व रु.५.०० लक्ष (भारीत) अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे.

आर्थिक वर्ष २०१०-११ करीता मागणी क्रमांक वाय ६," ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च १०१ मृदसर्वेक्षण व चाचणी (०१)(०१)एक भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण या खालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११४८) दत्तमत (योजनेत्तर) " २७ गौण बांधकाम (Minor Work) या उपलेखाशिर्षाखाली रु.१.१० लक्ष इतकी तरतूद उपलब्ध आहे. सदर तरतूद अपुरी असल्याने,संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अखत्यारीतील विभागीय प्रयोगशाळा नुतनीकरणाचे काम करण्यासाठी रु. ७.४५ लक्ष इतकी तरतूद पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्याची विनंती केली होती. त्याअनुषंगाने पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता.

कृ.मा.पहा....

विधानमंडळास सादर करण्यात आलेल्या सन २०१०-११ या वर्षाच्या खर्चाचे पूरक विवरणपत्रास दिनांक १२ जुलै,२०१० रोजी विधानसभेने मान्यता दिली आहे. दि.३१ मार्च,२०११ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिली असून ते महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम,२०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -२० ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २७ जुलै,२०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अखत्यारीतील विभागीय प्रयोगशाळा नुतनीकरणाचे काम करण्यासाठी रु. ७.४५ लक्ष अनुदान पुरवणी मागणी मागणीद्वारे उपलब्ध झाले असून, सदर अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आर्थिक वर्ष २०१०-११ करीता मागणी क्रमांक वाय ६," ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च १०१ मृदसर्वेक्षण व चाचणी (०१)(०१)एक भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण या खालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११४८) दत्तमत (योजनेत्तर) " २७ गौण बांधकाम (Minor Work) या उपलेखाशिर्षाखाली **स्तंभ-७** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **रु.७.४५ लक्ष (रुपये सात लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) इतके दत्तमत्त** अनुदान उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अखत्यारीतील विभागीय प्रयोगशाळा नुतनीकरणाचे काम करण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयान्वये मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | उपशिर्ष | सन २०१०-११ करिता मंजूर तरतूद | **सन २०१०-११ या वर्षाकरिता पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेले अनुदान** | सन २०१०-११ करिता एकूण उपलब्ध झालेले अनुदान | यापूर्वी दि.२८ जून२०१० च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेले अनुदान | **या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान** |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. |
| **१.** | **२७-गौण** | **१.१०** | **७.४५** | **८.५५** | **१.००** | **७.४५** |

२. सदर मंजूर अनुदानातून संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे (Monthly Cash Flow) खर्च करावा. वरील खर्च "मागणी क्र.वाय-६, ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च- (००) १०१-मृद सर्वेक्षण व चाचणी - (०१) (०१) एक - भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण याखालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११३९) दत्तमत (४४०२ ११४८) भारीत" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

३.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००९१६१७२१२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श. वि. दुर्वे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोकण
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,कोकण
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर(लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-२० (२ प्रती)
७. कक्ष अधिकारी,पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती पापु १५